वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेतील "प्रकल्प सहायक" पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती
**श्रीमती प्राजक्ता पाटील, सहायक कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२०२४/प्र.क्र.१०२/प्रशा-३ (१४-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ०२ ऑगस्ट, २०२४.

वाचा : १) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/कार्यासन १२, दि. १७-१२-२०१६
२) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि. ३१-०८-२०१७
३) सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या.१२, दि. १६-०२-२०१८
४) सा.प्र.वि. शासन आदेश क्र. एएससी-१५२३/प्र.क्र.८४(भाग-१)/१४-अ, दि. १४-०८-२०२३

**शासन आदेश**

संदर्भाधीन क्र. ४ येथील दिनांक १४.०८.२०२३ च्या शासन आदेशान्वये श्रीमती प्राजक्ता रविंद्र पाटील, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांची राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर या कार्यालयातील "सहायक कक्ष अधिकारी" या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे. त्यानुसार श्रीमती पाटील या राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर कार्यालयात दि.०१.१२.२०२३ पासून कार्यरत आहेत.

आता, श्रीमती प्राजक्ता रविंद्र पाटील, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांची वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या कार्यालयातील "प्रकल्प सहायक" पदावर २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव व पदनाम | सध्याचे प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीचे ठिकाण | प्रतिनियुक्तीच्या ठिकाणावरील पदनाम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्रीमती प्राजक्ता रविंद्र पाटील, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग | राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर | वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर | प्रकल्प सहायक |

२. श्रीमती पाटील ह्या राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर या कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १६.०२.२०१८ मधील तरतुदीनुसार, संबंधित कर्मचाऱ्याने प्रतिनियुक्तीवरुन मूळ प्रशासकीय विभागात / कार्यालयात सेवा प्रत्यावर्तीत झाल्यावर मूळ विभागात मूळ संवर्गात किमान ३ वर्षे सेवा कालावधी (cooling off) पूर्ण करणे आवश्यक आहे. श्रीमती पाटील सदर अट पूर्ण करीत नाहीत. तथापि, श्रीमती पाटील यांची कौटुंबिक अडचण तसेच वनामती, नागपूर या कार्यालयाची प्रशासकीय निकड विचारात घेता श्रीमती पाटील यांची मूळ विभागातील ३ वर्षे(सेवा) कालावधी पूर्ण करण्याची अट एक विशेष बाब म्हणून शिथिल करुन श्रीमती प्रा.र.पाटील, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग(सध्या राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर या कार्यालयात कार्यरत) यांची वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या कार्यालयातील "प्रकल्प सहायक" या पदावर २ वर्षांच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

(अ) उपरोक्त कर्मचारी ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार सुपूर्द करेल, त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला संबंधित कर्मचारी आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/संवर्ग नियंत्रण अधिकारी/सक्षम प्राधिकारी राखून ठेवतील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) संबंधित अधिकाऱ्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा...इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७-१२-२०१६ मधील तरतुदी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभागाने प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती याबाबत जलसंपदा विभाग/प्रशि-४ यांच्याशी सल्लामसलत करुन ठरवाव्यात.

४. श्रीमती पाटील, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांच्या इतर प्रशासकीय बाबी त्यांचा प्रशासकीय विभाग आणि सामान्य प्रशासन विभाग/प्रशि-४ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. श्रीमती पाटील, सहायक कक्ष अधिकारी ह्या सध्या राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर या कार्यालयात प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांची या आदेशान्वये वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या कार्यालयातील "प्रकल्प सहायक" या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आलेली असल्याने श्रीमती पाटील यांना नवीन प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर या कार्यालयाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०२१७३८२७९६०७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2024.08.02 17:52:57 +05'30'

**( ग.स.परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती प्रा.र.पाटील, सहायक कक्ष अधिकारी (राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सचिव, राज्य माहिती आयोग ,मुख्यालय, १३ वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई-३२
३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
४. सहसचिव/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय मुंबई.
५. सहसचिव/उपसचिव (प्रशि-४/माहिती), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. उपसचिव, राज्य माहिती आयोग खंडपीठ ,नागपूर.
७. सा.प्र.वि./प्रशा-३ (१४-अ) (संग्रहार्थ)